**एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता आर्थिक वर्ष सन २०२४-२५ साठी यशदा, पुणे या संस्थेस अनुदान वितरित करण्याबाबत**
**(वेतन ३ रा हप्ता)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२४/प्र.क्र.२६/प्रशि-२**
मंत्रालय, मुंबई
दिनांक-११/०२/२०२५

**वाचा** :-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४ / १३/१२-अ, दिनांक २०/०१/२०१४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४
४) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्रमांक-सीपीटीपी प्रशासन/निधी मागणी/२०२४-२५/१५१, दिनांक ३०/१२/२०२४

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्ती हाणाऱ्या गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यासाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत आहे. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या प्रशिक्षण संस्थेच्या आस्थापनेवर सीपीटीपी कक्षासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये एकूण १२ पदे मंजूर करण्यात आली आहेत. त्यापैकी सद्य:स्थितीत लेखाधिकारी, वर्ग-१ हे एकच पद दिनांक २६/०८/२०२० पासून भरण्यात आलेले आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात माहे एप्रिल,२०२४ ते जुलै,२०२४ या कालावधीकरीता रुपये ७,४७,१२५/- इतका निधी दिनांक ०३/०६/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये तसेच माहे ऑगस्ट,२०२४ ते माहे डिसेंबर,२०२४ या कालावधीतील वेतनाकरीता रुपये ७,०९,८८०/- इतका निधी दिनांक ३०/०८/२०२४ च्या शासन निर्णयान्वये असा एकूण रुपये १४,५७,००५/- यशदा, पुणे यांना वितरित करण्यात आला आहे. आता यशदा, पुणे यांचा लेखाधिकारी,वर्ग-१ या पदाकरीता जानेवारी,२०२५ ते मार्च,२०२५ या कालावधीकरीता एकूण रुपये ४,६१,०१०/- इतक्या निधी मागणीचा प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेस "लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८७१) ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात खालीलप्रमाणे निधी वितरित करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| बाब | सन २०२४-२५ अर्थसंकल्पीय अंदाज | आतापर्यंत वितरित केलेला निधी (एप्रिल ते डिसेंबर,२०२४) | यशदा यांचा जानेवारी,२०२५ ते मार्च,२०२५ या कालावधीतील निधी मागणी प्रस्ताव | वितरित करावयाचे अनुदान (स्तंभ ४) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ३६, सहायक अनुदाने (वेतन) | १,२६,१०,०००/- | १४,५७,००५/- | ४,६१,०१०/- | ४,६१,०१०/- |

अ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) पुणे या संस्थेने खर्च वितरित अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच देयके कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरित केल्यानंतर आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर व शासनाला सादर करावे.

उ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर यांना राहतील व त्याकरिता यशदा, पुणे त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

ऊ) वित्त विभाग, शासन परिपत्रक, दिनांक ०१/०४/२०२४ मधील नमूद अटी/ शर्तींचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम **रुपये ४,६१,०१०/-(रुपये चार लाख एकसष्ट हजार दहा फक्त)** आहरित करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१११२५६४६०२०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SMITA SHASHIKANT KURLE

Digitally signed by SMITA SHASHIKANT KURLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=01879df42d83d2fcc3971f45f8779d4fecb5770c61e1c0cf182 3404928867bc2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6D2E3A501FE815A7028DFF6EC076229AAAB612863B 0EE9041EE936D091AA18A6, cn=SMITA SHASHIKANT KURLE
Date: 2025.02.11 12:59:37 +05'30'

**( स्मिता कुर्ले )**
**कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई
६. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
७. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
९. निवडनस्ती.